सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाचा प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्रपुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुसुचित जमाती (ST) या घटकाचा राज्य हिश्याचा ४०% निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रमाव-२०२१/प्र.क्र.४५८/कु.क.
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई -४०० ००१.
तारीख: ०७ ऑक्टोंबर, २०२१

वाचा -

१) केंद्र शासनाचे मंजुरी आदेश No.PM १५/२/२०२१-PMMVY, दि.२५.०६.२०२१.
२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र. राकुकका/PMMVY/शासन निर्णय निर्गमित करणेबाबत/ ४३६७५ - ७७ /२०२१, दि.१२.७.२०२१
३) आदिवासी विकास विभाग मंत्रालय, मुंबई यांचा शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.५/कार्यासन -६, दि.२७.०९.२०२१.

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री मातृ वंदना ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राज्यात कार्यान्वित केली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा केंद्र हिश्याचा (६०%) प्रमाणे निधी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या नावे उघडण्यात आलेल्या ESCROW ACCOUNT मध्ये थेट जमा होतो व प्राप्त निधीच्या ४०% एवढा निधी राज्य हिश्यापोटी योजनेस उपलब्ध करुन दिला जातो.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून संवर्गनिहाय निधी (सर्वसाधारण, अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती घटकासाठी) प्राप्त झाला आहे. यामध्ये अनुसुचित जमाती (ST) या घटकासाठी संदर्भ क्र.१ अन्वये रु.३,०२,००,१०३/- (रुपये तीन कोटी दोन लाख एकशे तीन फक्त) एवढा निधी राज्यास प्राप्त झाला असून सदर निधी ESCROW ACCOUNT मध्ये जमा झालेला आहे. या निधीस अनुरुप असा राज्य हिश्याचा ४०% नुसार रु.२,०१,३३,४०२/- (रुपये दोन कोटी एक लाख तेहत्तीस हजार चारशे दोन फक्त) एवढा निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. राज्य हिश्यापोटी द्यावा लागणारा समरुप ४०% हिश्श्या नुसार रु.२,०१,३३,४०२/- (रुपये दोन कोटी एक लाख तेहत्तीस हजार चारशे दोन फक्त) एवढा निधी आदिवासी विकास विभागाकडून प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना दि.२७.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्प निधी वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्या संदर्भात पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री मातृवंदना योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाचा अनुसुचित जमाती (ST) या घटकासाठी राज्य शासनाचा ४०% नुसार एकूण रु.२,०१,३३,४०२/- (रुपये दोन कोटी एक लाख तेहत्तीस हजार चारशे दोन फक्त) एवढा निधी वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील व संबंधित लेखाशीर्ष खालीलप्रमाणे -

| अ.क्र. | लेखाशीर्ष | आदिवासी विकास विभागाने मंजुर केलेला निधी | राज्य हिश्यापोटी वितरीत करावयाचा ४०% निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र. T-०५<br>२२११- कुटुंब कल्याण<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना<br>(०२) (०२) प्रधानमंत्री मातृवंदना योजना (राज्य हिस्सा ४० %) (जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना)<br>२२११ १४४१<br>३१, सहाय्यक अनुदान वेतनेत्तर | रु.२,०१,३३,४०२/- | रु.२,०१,३३,४०२/- |

२. उपरोक्त निधीसाठी प्रशासकिय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे देयक कोषागारात सादर करुन राज्य हिश्यापोटी आवश्यक असलेला ४० % एवढा निधी प्राप्त करुन घेऊन आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा करण्याची कार्यवाही करावी. यासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन) आरोग्य सेवा, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१ सोबतच्या परिशिष्ठामधील अटी व शर्तींची पूर्तता केलेली आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर लाभपात्र लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात यावे.

४.	सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. T-०५, २२११- कुटुंब कल्याण, ७९६, जनजाती क्षेत्र उप योजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०२) (०२),प्रधानमंत्री मातृवंदना योजना (राज्य हिस्सा ४०%) (जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना) २२११ १४४१, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५.	सदर खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदर निधी हा सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही तसेच आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून फक्त अनुसुचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल, याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी.

६.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१ व अनौपचारीक संदर्भ क्र.८१४ /व्यय-१४, दि.०९.०९.२०२१ तसेच आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.५/कार्यासन-६, दि.२७.०९.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२११००७१५२९४५४११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nilesh Madhukar Falke

Digitally signed by Nilesh Madhukar Falke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9b937361525edcb194dec2d7985fb077e5abd6b9fad45b976539bce4d36b0b69, cn=Nilesh Madhukar Falke
Date: 2021.10.08 15:41:31 +05'30'

**(निलेश फाळके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखापरीक्षा), १/२, मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे

७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९. वित्त विभाग व्यय -१४ / अर्थसंकल्प -९, मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प / लेखा), मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (कु.क.)